कां दिली अशा अनेक कोडयांचा उलगडा ह्या दोन कल्पनांतील मूलभूतभेद लक्षांत आला म्हणजे सहजच होऊन जातो.

असहकारिता फक्त प्रकार जाणते प्रमाण जाणत नाहीं. ह्यामुळेंच असहकारिता आणे आणि पावले हिशेबांत घेऊं इच्छित नाहीं. असहकारिता पावलांचा हिशेब करीत नाहीं. सरकार चार पावलें माघार घेत आहे काय, दोन पावलें पुढें येऊन दोन आंगळें नमतें घेत आहे काय ? असलें प्रमाण असहकारितेला नको आहे. असहकारितेला हृदयपालट ( Change of heart ) पाहिजे असतो. जेथें हृदयपालट नाहीं तेथें केवळ सरकार चार आणे स्वराज्य देत आहे, चार पावलें माघार घेत आहे, सुनेला लागावें म्हणून लेकीला बोलून लोकांना ठकवूं पाहणाऱ्या सासूप्रमाणें कांहीं लहानसहान अधिकाऱ्यांना बडतर्फ करीत आहे किंवा दंड करीत आहे येवढया गोष्टीवर खूप होऊन आपणहि तेवढया पुरतें हात पसरून, दोन पावलें पुढें टाकावीत किंवा संतोषून अथवा संतापून जावें ह्यांत कांहीच अर्थ नाहीं. ह्यात हृदयपालट नाहीं, पश्चात्ताप नाहीं. ह्यांत फक्त नाइलाज व डावपेंचच आहेत. स्वराज्यापेक्षां सुद्धां म. गांधी ब्रिटिशांच्या हृदयपालटाला जास्त महत्व देत ह्याचें कारण तरी हेंच कीं, हृदयपालट होऊन झालेलें कार्यच टिकाऊ होईल.

शुद्ध असहकारितेला जरूर असणारा हा हृदयपालटाचा किंवा नोकरशाहीची शुद्धि किंवा श्राद्ध ( आणि खरें म्हटलें तर शुद्धि म्हणजेच श्राद्ध ) करण्याचा प्रयत्न फसला हें आम्हीं प्रथमच कबूल केलें आहे. परंतु प्रतियोगी सहकारितेच्या प्रमाणात्मक ( by digrees ) दृष्टीनें हा प्रयत्न सर्वस्वी फसला असें मुळींच म्हणतां येणार नाहीं.

कौन्सिलें, पदव्या, शाळा, कोर्टें ह्यांजवरील बहिष्कार, परदेशी मालावरील बहिष्कार, मद्यपाननिषेध ह्यांमुळें त्या त्या संस्था ओस पडल्या नाहींत हें जरी खरें असलें तरी त्या त्या संस्थांवर त्यांचा किती परिणाम झाला तें सरकारी रिपोर्ट, खास तज्ञांचे अभिप्राय व प्रत्यक्षस्थिती ह्यांवरून दिसून येतेंच.

कौन्सिलें हीं तमाशेवजा झालीं; पदव्या ह्या जर्मनीच्या खेळण्यांसारख्या पोरखेळच नव्हे तर उपहासास्पद व नालायकीच्या थर्मामिटरवजा झाल्या, शाळा ह्या " इंग्लंड देशांत, लंदन राजधानी " म्हणून घोकणाऱ्या पोरांच्या हमालखान्याऐवजीं ' गांधी महाराज की जय ' म्हणून जयजयकार करणाऱ्या भावी नागरिकांचे कोंडवाडे बनल्या आहेत, न्यायमंदिरें हीं क्रीडांगणें आणि तुरुंगखाने हीं विश्रांति गृहें बनली आहेत.

: ज्या सुधारलेल्या भाषेंत इभ्रत, स्पष्ट भाषेंत दरारा आणि ' डायरी ' भाषेंत धाक म्हणतां येईल तो ब्रिटीश सरकारचा, गोऱ्या माणसाचा आणि सरकारी शिक्याचा दरारा आतां मुळींच उरलेला नाहीं. असिस्टंट कलेक्टरपासून व्हाइसरॉयपर्यंत प्रत्येक दर्जाच्या अधिकाऱ्याला आणि कोणत्याहि सरकारी खात्याला आतां आपण केवळ " सरकारी " आहोंत येवढ्यावर कोठेंच कांहींच खास किंमत उरलेली नाहीं. सरकारचें नैतिक बळ म्हणजेच लोकांकरील नैतिक दरारा तो जवळ जवळ सर्वस्वीं नष्ट झाल्या सारखा आहे.

फल-श्रुति.

" कोणत्याहि धडधाकड मनुष्याला इतर सर्व मनुष्यांशीं सर्व बाबतींत परिपूर्ण आणि अखंड मतैक्य असल्यानें होणारे भीषण क्लेश सहन होणार नाहींत. म्हणून एकंदर कलहच कसा टाळतां येईल असा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. अमानुषीपणा आणि सूडबुद्धि ह्यांच्यापासून तो अलिप्त ठेवून त्याला अधिकाधिक उदात्त आणि आपला मानसिक व नैतिक विकास झालेला आहे असें वाटणाऱ्या स्त्रीपुरुषांना शोभेल असें स्वरूप कसें द्यावें हाच प्रश्न आहे. "

( प्रो. केज. )

ह्या प्रश्नाचें उत्तर म. गांधींनीं दिलें आहे.—

" गांधी ह्यांनीं जो हा अप्रतीकाराचा कार्यक्रम आंखून दिला आहे, त्यांतच त्याच्या स्वरूपाचा विश्वव्यापीपणा मला दिसून येतो, आपल्या सांप्रतच्या रचनेंत भयंकर अडचणी आज साऱ्या जगभर उपस्थित झाल्या आहेत त्या साऱ्या नाहींशा करण्याचें सामर्थ्य या कार्यक्रमांत मला दिसतें. हा कार्यक्रम गांधींनीं आपल्या देशापुरता आणि हिंदी लोकांपुरताच लागू केला आहे. पण ह्या मानवी सरहद्दी ओलांडून न जाण्याचें सामर्थ्य त्यांत आहे. "

* * * * *

"म. गांधींनीं बुद्ध-ख्रिस्तापासून थोरो-टॉलस्टॉयपर्यंतच्या एकंदर विभूतींनीं आणि तत्वज्ञान्यांनीं आचारांत व विचारांत पुरस्कार केलेल्या ह्या मार्गाला अगदीं आजकालच्या परिस्थितींत उपयोगी पडेल असें तात्विक व व्यावहारिक स्वरूप दिलें आहे. आणि " जगाच्या इतिहासांत अद्वितीय असें निःशस्त्रप्रतीकाराचें व अनत्याचारी सत्कीचें अगदीं नवें स्वरूप आपणापुढें व्यक्त केलें आहे."

* * * ह्या विवक्षित कार्यांत यश येवो किंवा अपयश येवो गांधींनीं ह्या तत्वाला राष्ट्रीय आणि संस्मरणीय स्वरूप दिलें आहे. आणि जगांतील कित्येक

राष्ट्रांचें व सर्व विचारवन्तांचें लक्ष ह्या नव्या मार्गाकडे खेंचलें आहे." (प्रो. केज्)

* * * *

"मानवी जातीच्या डोक्यांत कांहीं शहाणपण शिल्लक असेल, तर पाशवी शक्तीचें युग अस्तास गेलें असून शांति आणि बंधुभाव यांचें युग उदयास येत आहे, ही गोष्ट तिच्या ध्यानीं येईल." (रे० जॉन हेन्स होम्स्)

* * * *

* * *

जगाला मार्गदर्शक होण्याच्या प्रयत्नांत म. गांधींनीं हिंदुस्थानचें कांहीं अनहित केलें आहे असेंहि नाहीं. उलट राष्ट्रीयत्व, स्वातंत्र्यप्रियता, जरूर त्या स्वार्थत्यागाची तयारी हीं इतक्या प्रचण्ड प्रमाणावर वाढविलीं आहेत कीं, गांधींच्या ह्या 'जगनिराळ्या' नव्या मार्गाऐवजीं जुन्याच मार्गानें जाणाऱ्या कोणत्याहि मोठ्यांत मोठ्या पुढाऱ्यानें याहून कांहीं जास्त कामगिरी बजावली असती असें मुळींच म्हणतां येत नाहीं.

* * *

गांधींनीं ब्रिटिश सत्तेचा नैतिक पाया इतका पोखरून टाकला आहे, कॉंग्रेसचा व लोकपक्षीय चळवळीचा पाया इतका मजबूद घातला आहे, लोकमत-जागृति इतकी प्रचण्ड प्रमाणावर केली आहे, स्वार्थत्याग, सत्त्यत्याग व सर्वस्व-त्याग ह्यांचीं अशीं कांहीं अद्वितीय उदाहरणें राष्ट्रापुढें ठेविलीं आहेत व राष्ट्राला त्यांचें इतकें सुसंगत शिक्षण दिलें आहे कीं, ह्यापुढें कोणत्याहि मार्गानें स्वराज्य-प्राप्ति करून घेऊं पाहणाऱ्या दुर्लभ अशा योजकाचा मार्ग अगदीं सुलभ करून ठेविला आहे. फक्त शुद्ध कार्यनिष्ठा, निर्भेळ धैर्य आणि निर्मळ पुढारीपण ह्यांचीच उणीव आहे.

* * *

सर्व जगाचें लक्ष हिंदी राजकारण, हिंदी तत्वज्ञान आणि हिंदुस्थान ह्यांजकडे वेधून जगांतील विचारवन्तांस नवयुगाची आशा लाविली आहे. आणि म्हणूनच व्हिन्सेंट ॲंडरसन (न्यू यॉर्क हेरल्ड) ह्यांच्या शब्दांत गांधींच्या यशापयशाचा विचार करतांना शेवटीं असें म्हणावें लागतें कीं,—

"मानवजातीचा तारक म्हणून म्हणवून घेण्याचें भाग्य आज गांधींना प्राप्त झालें नसेल; तरी भविष्यकाळाचा मार्गदर्शक ह्या नात्यानें तरी त्यांचें नांव अजरामर होऊन जाईल.

## गांधींचें अवतार कार्य.

संहारावांचून जगांतील अस्वस्थतेचा उपसंहार व्हावा, हेंच म. गांधींचें अवतार कार्य आहे.

म. गांधींची असहकारिता हें राजकारण नसून तो धर्म आहे.

असहकारिता हा धर्म तत्वप्रधान नसून आचार प्रधान धर्म आहे.

म. गांधींचा धर्म हा ईश्वरधर्म नाहीं, पूजाधर्म नाहीं, परलोकधर्म नाहीं.

म. गांधींचा धर्म हा व्यवहार धर्म आहे, नीतिधर्म आहे; कर्तव्यकर्म आहे.

म. गांधींचा धर्म हा हिंदु धर्म, बुद्ध धर्म, ख्रिस्ती धर्म, इस्लामी धर्म अशा विविध धर्मांना आणि पंथांना विरोधी धर्म नसून त्या सर्वांना समाधिष्ठान देणारा धर्म आहे.

सत्य हें गांधी धर्माचें अधिष्ठान आहे.

अहिंसा हें गांधी धर्माचें स्वरूप आहे.

**शांति** हें या धर्मांतील **स्थैर्य** आहे आणि प्रेम हें या धर्मांतील **चैतन्य** आहे.

**सेवा** हें या धर्माचें लक्षण आहे आणि **स्वार्थत्याग** ही या धर्माची कसोटी आहे.

मानवी साध्यसाधनविषयक आचारविचारांची पुनर्घटना हें या धर्माचें साध्य आहे आणि हिंदी स्वराज्य हें या पुनर्घटनेचें साधन आहे.

समाप्त.

# श्री. सीताकान्त यांचीं पुस्तकें.

## नवजीवन माला.

१ सामर्थ्य, समृद्धि व शांति
२ सामर्थ्य संवर्धन
३ संजीवनी विद्या
४ शक्तिसरक्षण

## लघु नवजीवन माला.

५ सुलभ व्यायाम
६ संवयी
७ रोगहारक व्यायाम

## राष्ट्र-जीवन माला.

८ स्वराज्याचा उपःकाल
( लोकमान्यांचीं व्याख्यानें )
९ मार्ग व मार्गदर्शक

## चरित्र-माला.

१० महात्मा गांधी ( छोटें )
११ लाला लजपतराय
१२ देवी सरोजिनी
१३ म. गांधी ( मोठें )

## सर्व सामान्य.

१४ 'डॉक्टरांकडे तरी जा' !
१५ आरोग्य-सप्तक
१६ फिजी
१७ शांताराम
१८ भयंकर सुरा
१९ धंडू काकाचें लग्न
२० फुफ्फुसशक्तिसंवर्धन

## १९२४ सालचीं पुस्तकें.

१ आत्मोन्नति
२ आरोग्य चिंतामणी
३ मानस-चिकित्सा
४ सत्तावनचा शिलेदार